**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (पूर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम- MsDP) बुलडाणा जिल्ह्यातील अंगणवाडी बांधकामासाठी सन २०१५ -१६ चा केंद्रीय निधी पुनर्जिवित करून सन २०१९ - २० मध्ये विनियोगात आणण्यास मान्यता देणे आणि राज्य हिश्श्यातील निधी पुनश्च वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का.०७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - ०२/०१/२०२०

**संदर्भ:**

१. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(४)/२०१३-PP,दि.२३/१२/२०१५.
२. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP- ३ / १३(५)/ २०१३-PP,दि.२७/०२/२०१६.
३. शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग,क्र.अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७, दि.३१/०३/२०१६.
४. शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग,क्र.अविवि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७,दि.३०/०४/२०१६.
५. जिल्हाधिकारी कार्यालय ,बुलडाणा यांचे पत्र जा.क्र.कावि /अका /अल्पसंख्याक कक्ष /१६०/२०१९, दि.१८/०७/२०१९.
६. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.-३/१३/२९/२०१९-MsDP-MOMA ,दि.१२/१२/२०१९.

**प्रस्तावना :-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाने (GOI) केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या (MsDP) अंतर्गत गठित शक्तीप्रदान समितीच्या दिनांक १४/१२/२०१५ व २६/०२/२०१६ रोजी झालेल्या अनुक्रमे १०६ व १११ व्या बैठकीत बुलडाणा जिल्ह्यातील खामगांव, बुलडाणा, चिखली व शेगाव या गटातील एकूण ११६ अंगणवाडी बांधकामासाठी मंजूरी देण्यात येऊन संदर्भ क्र-३ न ४ मध्ये नमुद शासन निर्णयान्वये केंद्र + राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील निधी विहित अटींच्या अधीनतेने मंजूर करून जिल्हाधिकारी बुलडाणा,यांना वितरीत करण्यात आलेला आहे.

२. बुलडाणा जिल्ह्यातील मान्यताप्राप्त एकूण ११६ अंगणवाडी बांधकामापैकी १३ अंगणवाडीसाठी तांत्रिक व प्रशासकिय अडचणीमुळे **केंद्र + राज्य हिश्श्यातील पहिल्या हप्त्यातील रू.२९.२५ लाख (केंद्र हिस्सा रू.१७.५५ लाख अधिक राज्य हिस्सा रू.११.७० लाख) इतका वितरीत केलेला निधी विहित मुदतीमध्ये खर्च करता आलेला नाही.**

३. बुलडाणा जिल्ह्यातील बुलडाणा, चिखली, खामगांव व शेगांव या गटातील अंगणवाडी केंद्र बांधकामाकरीता सन २०१५ -१६ या आर्थिक वर्षात केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील वितरीत केलेला परंतु अखर्चित राहिलेला रू.१७,५५,०००/- ( सतरा लाख पंचावन्न हजार रूपये फक्त) लाख इतका निधी पुनर्जिवित

करून सदर निधीचा विनियोग सन २०१९-२० या आर्थिक वर्षात करण्यास मान्यता देण्यात येत असल्याबाबत केंद्र शासनाने त्यांचे दि.१२/१२/२०१९ (संदर्भ क्र.६ ) च्या पत्रान्वये कळविले आहे.

४. केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (पूर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP) बुलडाणा जिल्ह्यातील बुलडाणा,चिखली, खामगांव व शेगांव या गटातील एकूण १३ अंगणवाडी केंद्र बांधकामाकरीता सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील वितरीत केलेला परंतु अखर्चित असलेला रू.१७,५५,०००/- इतका केंद्रीय निधी केंद्र शासनाने पुनर्जिवित करून दिला आहे. सदर निधी खर्च करण्यासाठी जिल्हाधिकारी,बुलडाणा यांना वितरीत करण्यास मान्यता देणे, तसेच प्रस्तुत प्रकरणी संदर्भ क्र. (४) मध्ये शासन निर्णयान्वये राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील वितरीत केलेला रू.११,७०,०००/- (रूपये अकरा लाख सत्तर हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय अडचणीमुळे अखर्चित राहिल्याने शासन खाती जमा करण्यात आला आहे. सदर राज्य हिश्श्यातील रू.११,७०,०००/- लाख इतका निधी आता सन २०१९-२० या वित्तीय वर्षात जिल्हाधिकारी,बुलडाणा यांना वितरीत करण्यास मान्यता देऊन सदर निधी BDS प्रणालीवर वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्याप्रमाणे पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

१. केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (पूर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP) बुलडाणा जिल्ह्यातील बुलडाणा,चिखली, खामगांव व शेगांव या गटातील एकूण १३ अंगणवाडी केंद्र बांधकामाकरीता सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील वितरीत केलेला परंतु अखर्चित राहिलेला रू.१७,५५,०००/-( सतरा लाख पंचावन्न हजार रूपये फक्त ) लाख इतका निधी केंद्र शासनाने पुनर्जिवित करून दिला आहे. सदर निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात विनियोगात आणण्याकरीता तसेच केंद्रीय निधीच्या प्रमाणात आवश्यक असलेला राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील रू. ११,७०,०००/- ( रूपये आकरा लाख सत्तर हजार फक्त ) लाख इतका निधी सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतुदीतून BDS **प्रणालीवर खालीलप्रमाणे** वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| गट | कामाचे नाव | एकूण प्रकल्प | वितरित पहिला परंतू अखर्चित हिस्सा | | दि. १२/१२/२०१९ च्या केंद्र शासनाच्या पत्रान्वये पुनर्जिवित करून वितरित केलेला केंद्रिय हिस्सा | दि. १२/१२/२०१९ च्या केंद्र शासनाच्या पत्रान्वये पुनर्जिवित केलेल्या केंद्रीय निधीच्या प्रमाणात वितरित करावयाचा राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र | राज्य | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| बुलडाणा | अंगणवाडी केंद्र बांधकाम | ०२ | २,७०,००० | १,८०,००० | २,७०,००० | १,८०,००० |
| चिखली | अंगणवाडी केंद्र बांधकाम | ०१ | १,३५,००० | ९०,००० | १,३५,००० | ९०,००० |
| खामगाव | अंगणवाडी केंद्र बांधकाम | ०९ | १२,१५.००० | ८,१०,००० | १२,१५.००० | ८,१०,००० |
| शेगाव | अंगणवाडी केंद्र बांधकाम | ०१ | १,३५,००० | ९०,००० | १,३५,००० | ९०,००० |
| **एकूण** | | १३ | १७,५५,००० | ११,७०,००० | १७,५५,००० | ११,७०,००० |

२. जिल्हाधिकारी,बुलडाणा हे सदर योजनेचे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधी खर्च करताना संदर्भाधिन अनुक्रमे क्र.३ व क्र.४ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

३. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (पूर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP) अंतर्गत प्रस्तावित कामाच्या ठिकाणी ठळकपणे निदर्शनास येईल अशा ठिकाणी फलक लावण्यात यावा व त्यावर खालील बाबीचा समावेश करण्यात यावा.

- भारत सरकारचे राजचिन्ह /भारत सरकारच्या मंत्रालय /विभागाचे नाव
- प्रकल्प किंमत / केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण.
- योजनेचे नाव.
- काम सूरू होण्याचा दिनांक.
- अंमलबजावणी यंत्रणा.
- अधिकच्या माहिती व अभिप्रायासाठी अधिकारी/ अंमलबजावणी यंत्रणा यांचे संपर्काचा तपशिल संकेतस्थळासह.

४. उपरोक्त योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - समाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण,२०० - इतर कार्यक्रम,केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)"तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - समाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण,२०० - इतर कार्यक्रम,केंद्र पुरस्कृत योजना (००) (१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दि.०८/०७/२०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करून तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००१०२१४४५४३१०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

William Manwel Dsouza

Digitally signed by William Manwel Dsouza
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minority Welfare Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7d736942a8f478e484a5c21abe75b8bbf7a05351199 74e7126241c3ad35615c8, cn=William Manwel Dsouza
Date: 2020.01.02 14:49:45 +05'30'

**( वि. म. डिसोजा )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२.विभागीय आयुक्त,अमरावती

३.प्रधान सचिव,महिला बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास केंद्र,रायगड भवन, नवी मुंबई.
५.जिल्हाधिकारी,बुलडाणा.
६.उप मुख्य कार्यकारी अधिकारी (महिला व बालविकास),जिल्हा परिषद,बुलडाणा
७.महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
८.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा )मुंबई/नागपूर.
९.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
१०.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
११.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, बुलडाणा.
१२. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय.मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी,बुलडाणा.
१४.वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४/व्यय -४) मंत्रालय,मुंबई.
१५.नियोजन विभाग (कार्या.१४७५) मंत्रालय,मुंबई.
१६.निवडनस्ती,(का.७).